**Convertion in Regular Temparary Establishment :- Shri. Keshav V. Deshmukh, working under Superintending Engineer, Akola Irrigation Circle, Akola**

**कार्यव्ययी व रोजंदारी आस्थापनेवरील पदाचे अस्थायी आस्थापनेवरील पदामध्ये रुपांतरण अधिक्षक अभियंता, अकोला पाटबंधारे मंडळ. अकोला- श्री.केशव वसंतराव देशमुख,मजूर.**

**महाराष्ट्र शासन**

जलसंपदा विभाग,
शासन निर्णय क्रमांक :एसयुटी- २००४/(१५६/०४)/आ (काम )
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांकः-१२/१२/२०११

पहावेः १) शासन निर्णय, सार्वजनीक बांधकाम विभाग, क्रः रु.अ.आ. १५९६/२२८/सेवा-५, दिनांक.२४.०४.२००१.

२) अधिक्षक अभियंता, अकोला पाटबंधारे मंडळ. अकोला यांचे पत्र क्रः७०५/आस्था-५/अपामं, दिनांक. ०८.०४.२००९.

**प्रस्तावनाः-**

श्री.केशव वसंतराव देशमुख हे रोजदंारी आस्थापनेवर 'चौकीदार' म्हणून दि.२.१०.१९८८ ते दि.१५.१.१९९२ या कालावधीत कार्यरत होते. त्यांना नियमानुसार एक महिन्याची नोटीस देवून दि.१६.१.१९९२ पासुन कामावरुन कमी करण्यात येऊन नुकसान भरपाई देण्यात आली. परंतु त्यांनी नुकसान भरपाईची रक्कम स्विकारली नाही. त्यांनी कामावर परत घेण्यासाठी मा.कामगार न्यायालय, अकोला येथे दावा क्र.५९/९२ दाखल केला. त्यामध्ये याचिकाकर्त्यास दि.१६.१.१९९२ पासुन सेवासातत्यासह सेवेत पुनर्स्थापित करावे व संपुर्ण थकबाकी दयावी, असा निर्णय मा.कामगार न्यायालयाने दि.२७.९.२००२ रोजी दिला. उपरोक्त निर्णयाविरुध्द शासनाने दाखल केलल्या दावा क्र. १२५/२००२ मध्ये मा.औद्योगिक न्यायालयाने दि.०७.०४.२००४ रोजी निर्णय देवून मा.कामगार न्यायालय, अकोला यांच्या दि.२७.९.२००२ च्या निर्णयामधील दि.१६.१.१९९२ पासुन सेवेत सेवासातत्यासह पुनर्स्थापित करण्याच्या निर्णयास बाधा न येता केवळ दि.१६.१.१९९२ पासुन मागील पूर्ण थकबाकीपैकी ५० टक्के थकबाकी दयावी, असे आदेश दिले. सदर निर्णयाविरुध्द मुंबई उच्च न्यायालयात अपिल दाखल करु नये, व औद्योगिक न्यायालयाच्या निर्णयानुसार कार्यवाही करावी असा सल्ला विधी व न्याय विभाग, नागपूर यांनी दिला. यानंतर मा.औद्योगिक न्यायालय,अकोला यांच्या दि.७.४.२००४ च्या निर्णयानुसार श्री.देशमुख यांना सेवासातत्यासह मजुर पदी रोजंदारी आस्थापनेवर कामावर घेऊन दि.१६.१.१९९२ पासुन सेवेत पुनर्स्थापित करण्याच्या दिनांकापर्यंत होणाऱ्या एकुण मागील थकबाकीपैकी ५० टक्के थकबाकी अदा करण्याच्या प्रस्तावास सचिव समितीने दि.१८.७.२००७ रोजी मान्यता दिली. त्यानुसार श्री.देशमुख यांना 'मजुर' पदी सेवासातत्यासह कामावर घेऊन दि.१६.१.१९९२ पासुन सेवेत पुनर्स्थापित करण्याच्या दिनांकापर्यंत होणाऱ्या एकुण थकबाकीपैकी ५० टक्के थकबाकी अदा करण्याचे आदेश शासनपत्र, दि.१३.८.२००७ रोजी काढण्यात आले. त्यानुसार ते दि.४.९.२००७ रोजी 'मजुर' पदी रोजंदारी आस्थापनेवर रुजु झाले व अदयापपर्यंत कार्यरत आहेत. श्री. देशमुख त्यांच्या बाबतीत कोणतेही न्यायालयीन प्रकरण प्रलंबित नाही. त्यामुळे न्या.कालेलकर करारातील तरतूदीनुसार त्यांना रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घेण्यासाठी अधीक्षक अभियंता, अकोला पाटबंधारे मंडळ, अकोला यांनी दि.०८.०४.२००९ च्या पत्रान्वये प्रस्ताव सादर केला आहे. सदर प्रस्तावानुसार श्री. देशमुख यांचा दि.२.१०.१९८८ हा प्रथम नियुक्तीचा दिनांक विचारात घेऊन शासन निर्णय दि.२४.०४.२००१ मधील अटीची पुर्तता होत असल्यामुळे

श्री देशमुख यांना 'मजुर' पदी रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घेण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. आता यासंदर्भात पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय:-**

अधिक्षक अभियंता, अकोला पाटबंधारे मंडळ. अकोला, अतर्गत कार्यरत असलेले श्री.केशव वसंतराव देशमुख यांचे मजूरपद अस्थायी आस्थापनेवर रुपांतरीत करण्यास आणि श्री.देशमुख यांना दि.१६.०१.१९९२ पासून सेवेत घेतल्याच्या दिवसापर्यंतच्या कालावधीसाठी ५० % थकबाकी अदा करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| अ .क्र | कर्मचा-याचे नाव | आस्थापनेचा प्रकार | प्रथम नवीन नियुक्तीचे पद व दिनांक | रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर आणावयाचा दिनांक | रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घ्यावयाचे पद | वेतनश्रेणी |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १ | श्री.केशव वसंतराव देशमुख | रोजंदारी | मजुर<br>२.१०.१९८८ | ०२.१०.१९९३ | मजुर | रु. ७५०-९४०<br>रु.२५५० - ३२०० (५ वा वेतन आयोग ) |

३. श्री. देशमुख यांना रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर आणल्यामुळे त्यांना पुढील सवलती देण्यात येत आहेत:-

अ) अस्थायी आस्थापनेवर रुपांतरीत धारण केलेल्या पदांकरता सेवाप्रवेश नियमानुसार वा अन्य प्रकारे विहित करण्यात आलेली किमान/कमाल वयोमर्यादेची व चतुर्थश्रेणी कर्मचा-यांचे बाबतीत शैक्षणिक अर्हतेची अट शिथिल करण्यात येत आहे.

ब) नेमणूक सेवायोजन कार्यालयाच्या शिफारशी व्यतीरिक्त अन्य मार्गाने झालेली असल्यास, सेवायोजन कार्यालयामार्फत भरती करण्याची अट देखिल शिथिल करण्यात येत आहे.

क) स्वास्थ्य प्रमाणपत्र सादर करण्याच्या अटीतून त्यांना सूट देण्यात येत आहे.

४. अधिक्षक अभियंता, अकोला पाटबंधारे मंडळ. अकोला, यांनी या आदेशातील सर्व अटी व शर्ती विचारात घेऊन कोणत्याही त्रुटी राहणार नाहीत यांची दक्षता घ्यावी आणि योग्य ते सविस्तर आदेश या शासननिर्णयाच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत निर्गमित करुन ते संबंधित कर्मचा-यांच्या निदर्शनास आणावेत. तपशिलामध्ये संबंधित कर्मचा-यांचे नांव, पदनाम, त्यांच्या प्रथम नियुक्तीचा दिनांक त्याला रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर ज्या दिनांकापासून आणण्यात आले आहे तो दिनांक यामध्ये कोणतीही चूक वा त्रुटी आढळून आल्यास क्षेत्रिय अधिका-यांनी अशी बाब शासनाच्या निदर्शनास तात्काळ आणाची. क्षेत्रिय अधिका-यांनी सदर आदेशात स्वत:च्या अधिकारात कोणतेही फेरबदल करु नयेत, तसेच हे आदेश संबंधित कर्मचा-यांच्या व्यक्तीश: निदर्शनास आणून शासनाने निर्गमित केलेले ओदशांच्या बाबतीत संबंधित कर्मचा-यांची (नाव, पदनाम,त्यांच्या प्रथम नियुक्तीचा दिनांक तसेच रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर आणण्याच्या दिनांकात दुरुस्ती इ. बाबतीत ) कोणतीही तक्रार नसल्यास त्याच्याकडून तशा आशयाचे प्रपत्र " ब" मधील दिलेल्या नमुन्यात हमीपत्र (Undertaking ) घेवून ते त्या कर्मचा-याच्या सेवापटात/सेवापुस्तकात चिकटवून ठेवावे आणि ही सर्व कार्यवाही पूर्ण केल्याचा अनुपालन अहवाला या आदेशाच्या दिनांकापासून तीन महिन्याच्या आत शासनाकडे पाठविला जाईल याबाबतीत संबंधित अधिक्षक अभियंत्यांनी सतर्क रहावे. या आदेशामध्ये काही तफावत/त्रुटी असल्याची संबंधित कर्मचा-यांची तक्रार असल्यास अशी तक्रार त्यांच्याकडून लेखी स्वरुपात घ्यावी आणि आपल्या कार्यालयाच्या अभिप्रायासहित दुरुस्तीचा प्रस्ताव या आदेशाच्या दिनांकापासून तीन महिन्याच्या आत शासनाकडे पाठविला जाईल याची दक्षता घ्यावी. दुरुस्ती प्रस्ताव पाठवितांना संबंधित कर्मचा-यांच्या नेमणुकांच्या आदेशांच्या प्रती, हजेरी पटांच्या प्रती आाणि सेवापट पाठविण्याची खबरदारी घ्यावी.

५.     श्री देशमुख,यांची वेतननिश्चिती त्यांना रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घेतल्याच्या दिनांकापासून करण्यात यावी. श्री देशमुख यांना देय थकबाकीपैकी २० टक्के थकबाकीची रक्कम ते स्वेच्छेने सोडण्याबाबत त्यांनी हमीपत्र दिले असल्याने त्याप्रमाणे थकबाकीची परिगणना करावी. सदर थकबाकीपैकी दि.- ३१ ऑगस्ट २००० पुर्वीची रक्कम दहा वार्षिक समान हफ्त्यात भविष्य निर्वाह निधीमध्ये जमा करावी. जमा केलेल्या रकमेस ३ वर्षे पुर्ण झाल्यानंतर ती रक्कम आहरणासाठी पात्र राहील. दि.३१ ऑगस्ट २००० नंतरची थकबाकीची रक्कम रोखीने व धनादेशाद्वारे अदा करण्यात यावी. परंतू सदर रकमेवर भविष्य निर्वाह निधीशी सबधित व्याज वगळता अन्य कोणत्याही प्रकारचे व्याज अनुज्ञेय असणार नाही आणि संबंधित कर्मचा-याकडून भविष्यात व्याजाबाबतची मागणी करण्यात येणार नाही, अश्याप्रकारचे प्रतिज्ञापत्र लिहून घेणे बंधनकारक राहील.

६.     सदर प्रस्तावावरील खर्च सन २०११ ते २०१२ या आर्थिक वर्षात संबंधित लेखाशीर्षाखालील मंजूर अनूदानातून भागविण्यात यावा.

७.     हे आदेश शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग, क्र. रूअआ- १५९६/२२८/सेवा -५, दिनांक २४.०४.२००१ अन्वये मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारांचा वापर करून काढण्यात येत आहे.

८.     हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर सांकेतांक क्रमांक २०१११२१२०६०२४६००१ अन्वये प्रसिध्द करण्यात आला आहे.

महाराष्ट्र राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

**( अ. अ. कोदे )**
**शासनाचे उप सचिव**

प्रत सहपत्रासहित अग्रेषित :-
महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र -१, मुंबई/ महाराष्ट्र -२ नागपूर
महालेखापाल, लेखा परीक्षा, महाराष्ट्र -१, मुंबई/ महाराष्ट्र -२ नागपूर
जिल्हा कोषागार अधिकारी, अकोला /बुलडाणा
वित्त विभाग, (व्यय-१२), मंत्रालय, मुंबई-४०००३२.
अधिक्षक अभियंता, अकोला पाटबंधारे मंडळ. अकोला
निवडनस्ती /आस्थापना (कामगार ) संग्रहार्थ